**मुंबईतील मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या अखत्यारीतील पूर्व द्रुतगती मार्ग व पश्चिम द्रुतगती मार्ग वर्गीकृत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः रवियो-२०१८/प्र.क्र.१०७/नियोजन-२**

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

दिनांक- १३ जून, २०१८.

**पहावे** :-१) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे अर्धशासकीय पत्र दि. ०९/०४/२०१८.

२) मुख्य अभियंता, विशेष प्रकल्प सार्वजनिक बांधकाम विभाग, यांचे पत्र क्र. मुअ(विप्र)/ का-१/हस्तांतरण/१००१/२०१८ दि. १०/५/२०१८.

३) शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१७/प्र.क्र.३१/२०१७/रस्ते-६

**प्रस्तावना :-**

महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांनी संदर्भाधीन पत्रान्वये मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडे असलेले मुंबईतील पूर्व द्रुतगती मार्ग व पश्चिम द्रुतगती मार्ग हस्तांतरीत करण्याबाबत विनंती केली आहे. त्यानुषंगाने मुंबईतील पूर्व द्रुतगती मार्ग व पश्चिम द्रुतगती मार्ग वर्गीकृत करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-**

महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण यांचे मागणीस अनुसरून बृहन्मुंबई महानगरपालिका हद्दीतील पूर्व द्रुतगती मार्गाची १८.७५० कि.मी (साखळी क्रमांक ५६६/०० ते ५८४/७५०) लांबी द्रुतगती मार्ग क्र.५ व पश्चिम द्रुतगती मार्गाची साखळी क्रमांक ५०२/३५० ते ५२७/६८० (दहिसर चेक नाका ते माहिम जं.) अशी २५.३३० कि.मी. लांबी द्रुतगती मार्ग क्रमांक ६ ही लांबी संदर्भ क्र. ३ नुसार अवर्गीकृत करुन मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाला हस्तांतरित करण्यात आली होती. या शासन निर्णयान्वये पूर्व व पश्चिम द्रुतगती मार्गांची अवर्गीकृत लांबी वर्गीकृत करुन रस्ते विकास योजना २००१-२१ मध्ये समाविष्ठ करण्यात येत आहे.

तसेच पूर्व द्रुतगती मार्गाची साखळी क्र. ५६६/०० ते ५८४/७५० (१८.७५० कि.मी.) ही लांबी व पश्चिम द्रुतगती मार्गावरील साखळी क्र. ५०२/३५० ते ५१९/०० (दहिसर चेक नाका ते अंधेरी कुर्ला जं.) या लांबीवर मेट्रोचे बांधकाम सुरू असल्याने सदर लांबी वगळून साखळी क्र. ५१९/०० ते ५२७/६८० (अंधेरी कुर्ला जं. ते माहिम जं.) अशी ८.६८० कि.मी. लांबी सार्वजनिक बांधकाम विभागाकडे हस्तांतरीत करण्यात येत आहे.

द्रुतगती मार्गांची अवर्गीकृत लांबी वर्गीकृत केल्यानंतर रस्ते विकास योजना-२००१-२१ मध्ये समावेश होणाऱ्या द्रुतगती मार्ग खालील प्रमाणे:

| **अ.क्र.** | **द्रुतगती मार्गाचे नाव** | **द्रुतगती मार्ग क्रमांक** | **मार्गातील समाविष्ठ जिल्हे** | **एकुण लांबी (कि.मी.)** |
|---|---|---|---|---|
| १. | पुर्व द्रतगती मार्ग | द्रुतगती मार्ग क्र. ५ | मुंबई उपनगर व ठाणे. | २३.५५ कि.मी. |
| २. | पश्चिम द्रुतगती मार्ग | द्रुतगती मार्ग क्र. ६ | मुंबई उपनगर | २५.३३ कि.मी. |

हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यांत आलेला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१८०६१३१५२५४६५६१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Prashant Vinayakrao Patil

Digitally signed by Prashant Vinayakrao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d52614 3e814db5f8c505422af66a5628314537e, cn=Prashant Vinayakrao Patil
Date: 2018.06.13 15:29:52 +05'30'

**( प्रशांत पाटील )**

अवर सचिव (नियोजन), महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) प्रधान सचिव (नवि-१) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) महानगर आयुक्त, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण.
३) मुख्य अभियंता (विशेष प्रकल्प) सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
४) विभागीय आयुक्त, मंबई.
५) अधिक्षक अभियंता,मुंबई बांधकाम मंडळ,चेंबूर (यांनी सदर शासन निर्णयानुसार रस्ते विकास योजना २००१-२०२१ च्या रस्ते सूचीमध्ये नोंद घ्यावी व नकाशामध्ये बदल करण्यात यावा. तसेच केलेल्या कार्यवाहीचा अहवाल शासनास सादर करावा)
६) कार्यासन अधिकारी, रस्ते-१/रस्ते-६ सा.बां.वि. मंत्रालय, मुंबई यांना हस्तांतरणाच्या पुढील कार्यवाहीकरीता.
७) जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
८) जिल्हाधिकारी, मुंबई उपनगर.
९) संचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
१०) रस्ते विकास योजना २००१-२०२१ ची नस्ती.
११) निवडनस्ती.